# अली आणि जादूचं सूप

मराठी : नीलाम्बरी





खूप खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. इराणमध्ये एक मुलगा रहात होता. त्याचं नाव होतं अली.

अलीचे वडील एक श्रीमंत सावकार होते. त्याची आई सौंदर्यवती होती. ती खूप दयाळू आणि प्रेमळ होती. अलीचं घर म्हणजे एक प्रासादच होता. बागेत थुईथुई उडणारी कारंजी होती. अलीला भावंडं नव्हती. तो आपल्या आईवडिलांचा प्रचंड लाडका मुलगा आहे असं सर्वजण म्हणत असत.

अलीपुढे जगातली सगळी सुखं हात जोडून उभी होती. पण त्यामुळेच तो स्वार्थी आणि बिघडलेला मुलगा बनला होता.

“काय भिकार द्राक्षं आहेत.. ” असं म्हणून त्यानं मूठभर द्राक्षं भिरकावून दिली. तो आपल्या बिछान्यावर हटून बसला होता. त्याच्या खांद्यावर एक छोटं काळसर माकड बसलं होतं. “माझ्या माकडाला सुध्दा ही द्राक्षं आवडली नाहीयेत.. आपल्या दारासमोर येऊन प्रासादाची रया घालवून टाकणाऱ्या भिकाऱ्यांनाच असली द्राक्षं आवडू शकतात.”

अली असं म्हणत असतानाच त्याचे आईवडील त्याच्या खोलीत आहे. अलीच्या मनात जर कोणाबद्दल थोडं फार प्रेम असेल तर ते आईवडिलांबाबत होतं. “आम्ही हे काय ऐकतोय?” अलीच्या वडिलांनी विचारलं. “कोणत्याच माणसाबद्दल असं बोलू नये बेटा..”
त्यानंतर आईनं अलीच्या दोन्ही गालांची पापी घेतली. मग ते दोघं मुलापाशी बसले.

“अब्बा, ही द्राक्षं सडकी आहेत.” असं म्हणता म्हणता अलीनं आपल्या अब्बांच्या गळयात हात टाकले. “आपल्या दारात गर्दी करणाऱ्या भिकाऱ्यांनाच ती ठीक आहेत.”

असं म्हणून अलीनं आपलं नाक उडवलं आणि अब्बांच्या गालावर लाडिकपणे हात ठेवून म्हणाला, “अब्बा, त्या भिकाऱ्यांना तुम्ही इथे कशाला बसू देता?”

मग आईनं अलीचे हात हातात घेतले आणि ती म्हणाली “एक चांगला मुसलमान गरीब, अपंग, बेघर आणि उपाशी लोकांना मदत करतो. भिकारी त्याच प्रकारचे आहेत.” मग अलीचं माकड त्याच्या खांद्यावरुन उतरुन आईच्या मांडीवर जाऊन बसलं.

“हे बघ” अलीचे वडिल आपल्या हाताची घडी घालत म्हणाले “हे बघ, ते गरीब लोक अन्न मिळाल्यावर आपल्याला आशीर्वाद देतात. ते तिथेच राहतील. मला तुझ्याशी याबद्दल बोलायचं आहे.”

अली एकदम उठून उभा राहिला अब्बांचा पोशाख पाहून ते कुठेतरी लांबच्या दौऱ्यावर चालले आहेत हे त्याच्या लक्षात आलं. “अब्बा, तुम्ही कुठे चालला आहात. आई, तू त्यांना सांग ना.. परत दौऱ्यावर नका जाऊ. ते गेल्यावर मला आणि माझ्या माकडालाही खूप एकटं वाटतं.” आई यावर काही बोलली नसली तरी तिलाही अब्बांनी दौऱ्यावर जाऊ नये असंच वाटतंय हे अलीला माहिती होतं.

“मी थोड्याच दिवसात परत येईन. अली , मी नसताना तू आईची काळजी घे. आपल्या रागावर नियंत्रण ठेव. वेड्यासारखं वागणं तुला शोभत नाही.”



त्या दिवशी संध्याकाळी अली आपल्या आईबरोबर अंगणात उभा होता. त्याचे अब्बा एका पांढऱ्याशुभ्र घोड्यावर स्वार होऊन तीन नोकरांना घेऊन सफरीवर गेले. त्यांच्या घोड्यांवरच्या गोण्यांमध्ये मसाल्याचे पदार्थ आणि हिरमोती भरलेले होते. पण दोनच दिवसात अब्बा परतले. त्यांना खूप ताप आला होता. हातपाय खूप दुखत होते.





दुसऱ्या दिवशी काही निष्णात हकीम आणि डॉक्टर आले. त्यांनी अब्बांना तपासलं. प्रत्यकानं काहीतरी औषध किंवा काढा दिला. पण अब्बा म्हणजे सौदागराला कशानंच बरं वाटलं नाही.

अलीनं आपल्या माकडाला छातीपाशी कवटाळून धरलं होतं. अब्बांची अवस्था पाहून अलीच्या डोळयातून आलेले अश्रू माकड लगेच पुसायचं.
अली माकडाला म्हणायचा, “दोस्ता मी काय करु शकतो? आई रात्रंदिवस अब्बांपाशी बसून त्यांच्या कपाळावर गुलाबपाण्याच्या पट्ट्या ठेवतीय. आपण पण काहीतरी मदत करायला पाहिजे.”
मग अली चोरपावलांनी अब्बांच्या खोलीपाशी गेला आणि त्यानं हलक्या हातांनी दरवाजा ठोठावला. “ये” आई म्हणाली. अब्बा एका उंच पलंगावर झोपले होते. आपल्या आईचा इतका चिंताग्रस्त चेहरा अलीनं कधीच पाहिला नव्हता. अब्बांना खूपच ताप आहे. ते काही खात नाहीयेत. ते काहीतरी पुटपुटत होते. पण मला ते काय बोलतायत तेच कळत नाही.

मग अली अब्बांच्या जवळ गेला आणि म्हणाला, “अब्बा मी अली. तुम्हाला काही सांगायचं अहे का?” यावर आजारी वडिलांनी आपला हात उचलायचा प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला.

मग त्यांनी एकदम खालच्या पट्टीत “काह काह ला..” असा काहीतरी उच्चार केला.



अलीनं आपल्या आईकडे पाहिलं. अलीच्या डोळयात आता एक चमक होती. तो म्हणाला, “मला वाटतं अब्बा शुला कलमबार असं म्हणायचा प्रयत्न करतायत. आई, त्यांना शुला कलमबार हे चविष्ट सूप प्यायची इच्छा झालेली दिसते. पण ..”
“खरं तर शुला कलमबार तुझ्या अब्बांना फारसं आवडत नाही.” आई पण मुलासारखीच गोंधळात पडली होती. “ते सूप चविष्ट आहे... पण मध घालून केलेली मिठाई किंवा तांदुळाची खीर त्यांना जास्त आवडते.”

मग अली अब्बांच्या पलंगाजवळ गुडघे टेकून बसला आणि म्हणाला “मला वाटतंय ते बरोबर आहे ना अब्बा, तुम्ही शुला कलमबारचीच फर्माईश केली ना?” मग अब्बांनी आपली मान सावकाशपणे होकारार्थी हलवली.

त्यावर एकही शब्द न बोलता अली त्या खोलीतून जवळपास पळत स्वयंपाकघरात गेला.
“तू पटकन शुला कलमबार बनव..” असा त्यानं आचाऱ्याला हुकूम सोडला. “ताबडतोब कर.. अब्बांनी त्याची फर्माईश केली आहे.”

“माफ करा मालक..” आचारी म्हणाला.. “आपल्याकडे डाळ आणि लसूण आहे. पण त्यासाठी पालक आणि कोथिंबीर लागेल आणि त्या एकदम ताज्या हव्यात.”
अलीनं आपले पाय आपटले आणि तो म्हणाला, “मग घेऊन या त्या भाज्या..”
शिर झुकवून आचारी म्हणाला, “स्वयंपाकघरात कामं करणारी मुलं आज नाहीत. तुझ्या आईसाठी मी आत्ताच केक तयार करायला ठेवला आहे. तो होईपर्यंत मी स्वयंपाकघर सोडून जाऊ शकत नाही.”
“हे बघ, मला या सगळयाची काही पर्वा नाही.” अली रागात म्हणाला. “मग मी स्वत: जाऊन सूपसाठी लागणारं सामान घेऊन येतो.”



अली धावतच आपल्या खोलीत गेला. त्यानं कपाटातून काही नाणी काढून आपल्या रेशमी पायजम्याच्या खिशात ठेवली. मग तो अंगणातून बाहेरच्या दरवाजाकडे गेला. तिथे तो एका भिकाऱ्याच्या कटोऱ्याला अडखळून पडला. “डुक्कर..!” अली किंचाळून म्हणाला. अलीच्या गुडघ्याला खरचटलं होतं आणि त्यातून रक्त येत होतं. मग त्यानं एक दीर्घ श्वास घेतला आणि तो दरवाजाला धरुन कसाबसा उभा राहिला. तेव्हा त्यानं अजाणतेपणी भिकाऱ्याच्या खांद्याचा आधार घेतला.
“सावकाश उठ अली..” तो भिकारी मंजुळ आवाजात म्हणाला. अलीनं इतका नादमय स्वर त्याआधी कधीच ऐकला नव्हता. “दुकानं बंद व्हायला अजून वेळ आहे.” तो भिकारी पुढे म्हणाला.
ते ऐकून अली बावचळला. “मी बाजारात चाललोय हे तुम्हाला कसं कळलं?” अलीच्या आवाजात मात्र पूर्वीसारखाच तिरस्कार ठासून भरलेला होता. “मला माहिती आहे..” तो भिकारी शांतपणे म्हणाला. “तुझ्या अब्बांनी शुला कलमबारची फर्माईश केली आहे हे पण मला माहिती आहे. शुला कलमबार मध्ये आजार पळवण्याची शक्ती आहे हेही मला माहिती आहे.”

पण भिकारी अंगुलीनिर्देश करुन म्हणाला, “सूपचं सामान – लसूण, कोथिंबीर, डाळ आणि पालक – सगळं जर तू रस्त्यावर भीक मागून मिळवलेल्या नाण्यातून आणलंस तरच सूपचा उपयोग होईल.”
“रस्त्यावर भीक..” हे ऐकून अलीच्या तळपायाची आग मस्तकाला पोचली. पण तो म्हणाला “मग तू तुझ्या कटोऱ्यातली भीक मागून आणलेली नाणी मला दे. त्याच्याबदल्यात मी तुला सोन्याची नाणी देतो.”
“हे बघ अली. ही गोष्ट इतकी सोपी नाही. शुला कलमबारचा उपयोग व्हावा असं वाटत असेल तर आजारी माणसाच्या कुटुंबातल्या एकानं भीक मागून नाणी जमा करायला हवीत.” भिकारी म्हणाला.



"कुटुंबातल्या एका सदस्यानं?" अलीनं त्या भिकाऱ्याकडे एक जळजळीत कटाक्ष टाकला. "तू सांगितलेल्या गोष्टीवर मी कसा विश्वास ठेवू? तू माझ्या वडिलांच्या कृपेनं इतथे बसला आहेस आणि फुकटचं खातो आहेस. तुला खऱ्या जगातलं काय माहिती आहे?"

भिकाऱ्यानं त्या मुलाकडे पाहिलं. मुलाची मती गुंग झालेली होती. "मी सांगतो त्या गोष्टींवर विश्वास ठेवण्याची तुला काही गरज नाही. पण तुला तुझ्या वडिलांना वाचवायचं असेल तर माझं ऐक." तो शांतपणे म्हणाला.

या दरम्यान माकड अलीचा पायजमा धरुन सतत दात विचकत होतं. भिकारी सांगत होता त्यावर माकडाचा विश्वास बसला होता.

अलीला भिकाऱ्याची कितीही किळस वाटत असली तरी अब्बांचा जीव वाचवायला तो काहीही करायला तयार होता. अब्बांची प्रकृती सुधारली तर आईचा कोमेजलेला चेहराही उजळणार होता.

"त्यासाठी मी भीकसुध्दा मागायला तयार आहे." अली म्हणाला. त्यानंतर अलीनं आपली हिरे जडवलेली पगडी सरळ केली. "मी मागायचाच अवकाश आहे, मला कोणीच नाही म्हणणार नाही."

अली तिथून जायला लागला. तेव्हा भिकाऱ्यानं त्याचा अंगरखा ओढून त्याला परत बोलावलं. तो भिकारी अलीला म्हणाला "तू भिकाऱ्यासारखे कपडे घाल. भिकाऱ्यासारखं वाकून कटोरा समोर करुन भीक माग."

आता अलीचं डोकंच चक्रावलं. त्याच्या कपाळावरच्या शिरा ताठरल्या. आपण आपला बहुमूल्य वेळ वाया घालवतोय असं त्याला वाटलं. मग त्यानं पटकन आपला भरजरी अंगरखा आणि पगडी उतरवली. दरम्यान भिकाऱ्यानं आपले फाटकेतुटके कपडे काढून अलीच्या हातात दिले. अलीनं आपला अंगरखा आणि पगडी भिकाऱ्यापाशी ठेवली. मग अलीनं चेहऱ्याला जमिनीवरची माती फासली. भिकाऱ्याचे कपडे घातले. मग माकडाला खांद्यावर घेऊन तो भीक मागायला निघाला.



अली अजीजी करत होता. रस्त्यावरुन चाललेल्या लोकांच्या हेटाळणीच्या नजरांपासून स्वत:ला वाचवायचा प्रयत्न करत होता. “दया करा..“ असं म्हणत अली उंची कपडे घातलेल्या एका जोडप्यापाशी गेला. “दया करा, माझे वडील मरायला टेकलेत. त्यांच्यावर दया करा. त्यांच्या सूपसाठी पैसे द्या. अल्ला तुमच्यावर मेहरबान होईल.”

प्रथम ते दोघं त्याच्यावर ओरडले. मग त्यातल्या महिलेनं आपल्या बटव्यातून एक सोन्याचं नाणं काढून अलीच्या कटोऱ्यात टाकलं. पण जसा अली वाकला तसा त्या पुरुषानं त्याला धक्का दिला. मग अली आणि माकड रस्त्याच्या बाजूला पडले. त्याच्या कटोऱ्यातलं नाणं कुठेतरी दूर पडलं.

“वडील मरायला टेकलेत.. ही डुकरं सोन्याचं नाणं मिळवायला काय काय बहाणे शोधतात.. खोटं बोलायला यांना लाजही वाटत नाही” असं तो पुरुष म्हणाला.

त्याच्या टोमण्यांची पर्वा न करता अलीनं आपला कटोरा आणि सोन्याचं नाणं उचललं. तो उभा राहिला. त्याच्या डोळ्यातले अश्रू आता गालावर ओघळले होते. तेव्हा माकडानं आपल्या पंजानं त्याचे अश्रू पुसले. “जे काही झालं ते ठीक आहे मित्रा.  आपल्याला डाळ, लसूण, कोथिंबीर आणि पालक आणण्यापुरती भीक मागायलाच हवी. पण लोक किती क्रूर आहेत. फाटक्या कपड्यांमागे मलाही काही स्वाभिमान असेल असा विचार ते का करत नाहीत?” अली म्हणाला.



त्यानंतर अलीनं आपला कटोरा उचलून परत भीक मागायला सुरुवात केली. तोपर्यंत सूर्य मावळायला आला होता आणि त्याचे पाय चालून चालून दुखायला लागले होते. लोकांनी त्याच्यावर कामचोर, मूर्ख, भीकेवर जगणारा असे चिक्कार ताशेरे मारले होते. त्याला शिव्या दिल्या होत्या.

संध्याकाळ होऊन रात्र अंधारली. तोपर्यंत त्याच्या कटोऱ्यात चिक्कार नाणी जमली होती. सूपचं सामान विकत घेताना अलीचे हात थरथरत होते. माकड त्याला चिकटलं होतं. ते मूल्यवान सामान अंगरख्याच्या एका कोपऱ्यात बांधून अलीनं आपल्या महालाकडे धाव घेतली.



भिकारी महालाच्या दरवाज्यातच बसलेला होता. अलीची पगडी आणि अंगरखा त्याच्यापाशीच होता. अली तिथे थांबला. त्यानं एक दीर्घ श्वास घेतला." तुमच्यावर मेहेरबान असावं अशी मी अल्लाला प्रार्थना करतो चाचा.." अली म्हणाला. "मी भीक मागत असताना लोकांनी मला खूप शिव्या दिल्या. त्यांना वाटत होतं की मी गरीब आहे."

भिकारी आपला एक डोळा उघडून म्हणाला, "आता तू भीक मागून सूपचं सामान विकत आणलं आहेस. तर अजून उशीर न करता अब्बांसाठी शुला कलमबार तयार कर."

अली पळत पळत स्वयंपाकघरात गेला. आचाऱ्यानं भिकाऱ्याच्या वेशातल्या अलीला आधी ओळखलंच नाही. तो अलीला हुसकून लावत होता. शेवटी अलीनं आपण कोण आहोत ते सांगितलं. मग आचाऱ्याला त्यानं पटकन शुला कलमबार तयार करायची विनंती केली.







मग माकडाला आपल्या पाठीवर बसवून अली गरमगरम शुला कलमबार घेऊन अब्बांच्या खोलीत गेला.

त्याचे फाटके कपडे आणि धुळीनं माखलेला चेहरा पाहून आईला आश्चर्यच वाटलं. पण अलीनं आपल्या ओठांवर बोट ठेवून गप्प रहाण्याची आईला विनंती केली. “आई, मी तुला नंतर सगळं सांगतो. पण आधी अब्बांना शुला कलमबार पाजू दे.”

मग आईनं आपली खुर्ची पलंगापाशी सरकवली. एका हातानं आधार देऊन नवऱ्याला बसतं केलं. अलीपण वडिलांपाशी बसला.

“आता तुम्ही थोडं शुला कलमबार पिता का?” त्यानं विनंती केली. मग अलीनं एक चमचाभर सूप अब्बांना भरवलं.

“अब्बा माझ्यासाठी, आईसाठी, तुमच्या स्वत:साठी हे प्या बरं..” मग अलीनं या सूपमुळे आपल्या वडिलांना बरं वाटावं अशी अल्लापाशी प्रार्थना केली. “त्या भिकाऱ्याचं म्हणणं खरं ठरलं तर तो मागेल ते मी त्याला देईन. गेल्या काही तासात मला खूप काही शिकायला मिळालं आहे.” अली मनोमन म्हणाला.

“अली..” आईच्या डोळयातून आनंदाश्रू वहात होते. “आपल्या अब्बांकडे पहा. इतक्या दिवसांनंतर त्यांच्या चेहऱ्यावर स्मित आहे.” आईचं म्हणणं खरं होतं. अब्बांचा श्वासोच्छ्वासही आता सुधारला होता. त्यांच्या डोळयात जान आणि चेहऱ्यावर हास्य होतं. काही क्षणांनंतर त्यांनी डोळे उघडले. ते पाहून अली प्रचंड खुष झाला. त्याच्या हातातला चमचा खाली पडला.

“आता तो वाडगा आणि चमचा माझ्याकडे दे..” असं म्हणत आईनं सूप आपल्या हातात घेतलं. आता अब्बांना मी सूप पाजते. तू जाऊन स्वच्छ आंघोळ कर आणि फाटके कपडे फेकून दे.

“नाही मुला..” अलीचे अब्बा म्हणाले. त्यांचा आवाज स्पष्ट आणि स्वर वरचा होता. “तो फाटका अंगरखा कधीच टाकू नकोस. मनाच्या औदार्यामुळे जीवनात नेहमी आनंद मिळतो याची आठवण तुला तो अंगरखा कायम करुन देईल.”



“मी हा धडा कधीच विसरणार नाही. अब्बा.. ” असं म्हणत त्यानं अब्बांचे हात हातात घेऊन त्यावर ओठ टेकले. मग अली पळत पळत महालाच्या दरवाज्यापाशी गेला. तिथे जाऊन त्यानं त्या भिकाऱ्याला वाकून नमस्कार केला. त्याला नम्रपणे विचारलं, “मी तुमचा अंगरखा माझ्याकडे ठेवू शकतो का? माझे अब्बा तुम्हाला नवीन अंगरखा देतील. पाहिजे तितके देतील.”

भिकारी जवळच्या लाकडी काठीच्या आधारानं लडखडत उभा राहिला. “अली, तू तो अंगरखा कायम जवळ बाळग. तो अंगरखा तुला मिळालेले टोमणे आणि शिव्या यांची आठवण करुन देईल. पण तुझे कपडे मात्र परत घेऊन जा. तुझ्या अब्बांना म्हणावं, त्यांनी दिलेली भेट मी जरुर स्वीकारेन.”

अलीनं त्या भिकाऱ्याला आधार दिला आणि म्हणाला.. “आता तुम्ही कुठे जाणार? तुम्ही कायम इथेच रहावं अशी माझी इच्छा आहे.”





"मी चाललो आहे. पण मी इथेच असेन." भिकारी म्हणाला. मग तो एकदम खळखळून हसला.. "मी चाललो आहे पण मी कायम इथेच  असेन. तुझ्या अब्बांची प्रकृती आता सुधारेल आणि आईचा चेहरा आनंदी दिसेल."

"आणि तू.." भिकारी अलीच्या कपाळावर ओठ टेकवत म्हणाला.. "तू तुझ्या आईवडिलांची म्हातारपणची काठी होशील."

असं म्हणून तो भिकारी अंधारात अदृश्य झाला.

समाप्त



